सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सार्वजनिक - खाजगी भागीदारीने एकात्मिक कृषि विकासाच्या प्रकल्पांच्या अंमलबजावणीबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकृवि-२०१४/प्र.क्र. ४९/राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -३२
तारीख: २८ ऑगस्ट, २०१४

वाचा :

१) **शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१३/प्र.क्र.२५/राकृवियो कक्ष, दि. २१ फेब्रुवारी, २०१३**
२) **शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१३/प्र.क्र.२५/राकृवियो कक्ष, दि. २६ फेब्रुवारी, २०१३**
३) **शासन निर्णय क्रमांकः राकृवि-२०१४/प्र.क्र.१५/राकृवियो कक्ष, दि. २८ एप्रिल, २०१४**
४) **शासन निर्णय क्रमांकः राकृवि-२०१४/प्र.क्र.१५/राकृवियो कक्ष, दि. १७ जून, २०१४**
५) **राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीच्या ७ व्या बैठकीचे इतिवृत्त राकृवि-२०१४/प्र.क्र.४९/राकृवियो कक्ष, दि. २८ ऑगस्ट, २०१४**

प्रस्तावना:

केंद्राय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सार्वजनिक-खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासासाठी (PPP-IAD) विविध पिकांचे उत्पादन ते विक्री व्यवस्था असलेले मुल्य-साखळी विकासाचे प्रकल्प राबविण्यासाठी संरचना विहीत केलेली आहे. सदर संरचनेंतर्गत राज्य सरकारच्या नियंत्रणाखाली राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत आर्थिक मदत देऊन खाजगी क्षेत्रातील संस्थाच्या/कंपन्याच्या पुढाकाराने तसेच शेतक-यांच्या सहयोगातून कृषि व संलग्न क्षेत्रामध्ये विविध पिकांचे उत्पादन ते विक्री व्यवस्था असलेली मुल्य-साखळी व्यवस्था उभारण्यात येणार आहे.

त्यानुषंगाने, राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या राज्यात सार्वजनिक व खाजगी भागीदारीने एकात्मिक कृषी विकासाचे (PPP-IAD) प्रकल्प राबविण्यास वेळेवेळी मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सन २०१२-१३ मध्ये २० खाजगी संस्थाच्या भागीदारीतून एकूण ११ प्रकल्प आणि २०१३-१४ मध्ये २० खाजगी संस्थाच्या भागीदारीतून एकूण १६ प्रकल्प राबविण्यात आले.

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) १७ व्या बैठकीमध्ये सार्वजनिक व खाजगी भागीदारीने एकात्मिक कृषी विकासाचे विविध प्रकल्प सन २०१४-१५ मध्ये राबविण्याकरीता रु. १०० कोटी रकमेची तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. त्याचप्रमाणे,

राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने खरीप हंगामाची गरज लक्षात घेता, अशा सर्व प्रकल्पांना अपर मुख्य सचिव (कृषि व पणन) यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीची (SLPSC) मान्यता घेऊन तात्काळ प्रकल्प अंमलबजावणी करण्यात यावी व तद्नंतर या प्रकल्पांना राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीची कार्योत्तर मान्यता घेण्यात यावी असे निदेशीत केलेले आहे. त्यानुषंगाने सन २०१४-१५ मध्ये सार्वजनिक खाजगी भागीदारीने एकात्मिक कृषी विकासाच्या एकूण २३ प्रकल्पांना दि. २८ एप्रिल, २०१४ व दि. १७ जून, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. राज्यस्तरीय प्रकल्प छानणी समितीची ७ वी बैठक दि. २६ ऑगस्ट २०१४ रोजी पार पडली, सदर बैठकीमध्ये सार्वजनिक खाजगी भागीदारीतून राबवावयाच्या ५ प्रकल्पांना समितीने मान्यता दिली आहे त्यानुषंगाने सदर ५ प्रकल्प सन २०१४-१५ पासून राबविण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे-

## शासन निर्णय:

**१.** सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सार्वजनिक-खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासाचे (PPP-IAD) मुल्य-साखळी विकासाच्या प्रकल्पांतर्गत ५ प्रकल्प सोबत जोडलेल्या परिशिष्ठामध्ये नमुद केलेल्या विवरणानुसार राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. व्यवस्थापकीय संचालक (म.रा.फ. व औ.व.मं.) संचालक (फलोत्पादन), संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी सदर प्रकल्पांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने सर्व खाजगी उद्योजकांशी सल्ला मसलत करुन तात्काळ मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात. त्यादृष्टीने सदर प्रकल्पांशी निगडित सर्व समन्वय अधिका-यांनी संबंधित खाजगी संस्था/कंपन्या व शासन यंत्रणेमध्ये समन्वय राखावा.

३. सदर प्रकल्पांच्या राज्यस्तरावरुन संनियंत्रणाची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय समन्वय समितीवर राहील. त्याचप्रमाणे, राज्यस्तरीय समन्वय समितीमध्ये सर्व संबंधित समन्वय अधिका-यांचा समावेश करण्यात यावा आणि प्रकल्पांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी सदर समिती आवश्यकतेनुसार इतर अधिका-यांचा देखिल समितीमध्ये समावेश करु शकेल.

४. राज्यस्तरीय समन्वय समितीची कार्ये पुढीलप्रमाणे असतील -

a. सार्वजनिक-खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासाच्या (PPP-IAD) मंजूर प्रकल्पांचे राज्यस्तरावरुन संनियंत्रण करणे.

b. प्रकल्पांच्या प्रगतीचा मासिक आढावा घेणे.

c. सदर प्रकल्पामध्ये सहभागी खाजगी संस्था/कंपन्या आणि इतर संबंधितासोबत ३ महिन्यातून किमान एकदा बैठक घेऊन प्रकल्पाच्या अंमलबजावणीमध्ये जर काही अडचणी निदर्शनास येत असतील तर त्याबाबत चर्चा करुन त्यावर उपाययोजना सुचविणे.

d. जिल्हास्तरावरील विभागाची क्षेत्रिय यंत्रणा आणि प्रकल्पाशी संबंधित संस्थेचे जिल्हास्तरावरील प्रतिनिधी यामध्ये समन्वय ठेवणे.

e. जिल्हास्तरावर प्रकल्पांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी योग्य त्या सर्व उपाययोजना करणे.

f. प्रकल्पांचा मूल्यमापन अहवाल आणि Impact Assessment अहवाल तयार करुन शासनास सादर करणे.

५. या शासन निर्णयान्वये सन २०१४-१५ करीता ५ प्रकल्पांची पिकनिहाय यादी तसेच सदर प्रकल्पांमधील खाजगी संस्था/कंपन्या, शेतकरी आणि शासनाचा आर्थिक सहभाग या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आलेला असून त्यानुसार सर्व प्रकल्पांची कटाक्षाने अंमलबजावणी करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णया सोबतच्या परिशिष्ठातील अनु.क्र. १ येथील प्रकल्प सन २०१४-१५ मध्ये राबविण्यात यावा, अनु. क्र. २, ३ व ५ येथील प्रकल्प सन २०१४-१५ ते सन २०१६-१७ या कालावधीमध्ये आणि अनु. क्र. ४ येथील प्रकल्प सन २०१४-१५ व सन २०१५-१६ या कालावधीमध्ये सदर प्रकल्पांच्या प्रकल्प अहवालानुसार राबवावयाचे आहेत.

७. शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठामधील अनु.क्र. ४ येथील ' TOPS तंत्राव्दारे पिक कापणी प्रयोगांची संख्या सिमीत करण्यावर संशोधन व विकास प्रकल्प ' राबविण्याकरिता मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, पुणे हे प्रकल्प अंमलबजावणीचे प्रमुख असतील व त्यांनी खाजगी कंपनीसोबत समन्वय साधून सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीचे नियोजन करावे व त्याकरिता मार्गदर्शक सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात. सदर प्रकल्प दोन टप्प्यामध्ये राबविण्यात यावा -

- **पहिला टप्पा** - पिक कापणी प्रयोगांची संख्या व त्यांच्या ठिकाणांची निवड करण्याकरिता खाजगी कंपनीव्दारे प्रतिमान (MODEL) विकसीत करण्यात येईल व या कामाकरिता शासनाकडून राष्ट्रीय कृषि विकास योजनेंर्गत प्रकल्प अहवालाप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात यावा. तद्नंतर सदर प्रतिमानाच्या उपयुक्तता व व्यवहार्यतेबाबत रीतसर परीक्षण (Testing & Validation) करण्यात यावे.

- **दुसरा टप्पा** - खाजगी कंपनीने महाराष्ट्राकरिता विकसीत केलेल्या प्रतिमानाची उपयुक्तता निदर्शनास आल्यास त्या आधारे सॉफ्टवेअर (Landsat, MODIS, IRS, SPOT, Sentinel and Suomi-NPP सह) विकसीत करुन शासनास हस्तांतरीत करण्याचा टप्पा/प्रकल्प राबविण्यात यावा, या कामाकरिता कंपनीला प्रकल्प अहवालाप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात यावा.

८. प्रकल्पांच्या अंमलबजावणीची जबाबदारी सर्व संबंधित संचालकांची असेल. त्यानुषंगाने त्यांनी सर्व प्रकल्पांच्या मार्गदर्शक सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात, तसेच सदर प्रकल्पांना वेळोवेळी

वितरित करण्यात येणा-या निधीचे. व्यवस्थापन करावे आणि निधी विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच प्रकल्पांचा मासिक भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल वेळोवेळी आयुक्त (कृषि) यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

९. संदर्भाधीन दि. २१ फेब्रुवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्प जिल्हास्तरावर राबविण्यासाठी प्रकल्पाशी संबंधित जिल्हयाचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हा प्रकल्प समन्वय समिती स्थापन करावी. सदर समितीमध्ये या शासन निर्णयान्वये प्रकल्प संचालक (आत्मा), कृषि विकास अधिकारी, उप विभागीय कृषि अधिकारी, प्रकल्पाशी संबंधित तालुक्याचे तालुका कृषि अधिकारी आणि इतर संबंधित अधिका-यांचा समावेश करण्यात येत आहे. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी जिल्हयांतर्गत मंजूर असलेल्या प्रकल्पाशी संबंधित संस्थेच्या/कंपनीच्या जिल्हास्तरावरील प्रतिनिधींशी आवश्यक समन्वय साधावा.

१०. या प्रकल्पांतर्गत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध करुन दयावयाचा निधी सन २०१४-१५ मध्ये उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीतून प्रकल्पांच्या मागणीनुसार वेळोवेळी उपलब्ध करुन दयावा तसेच सदर निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार उपयोगात आणावा. आयुक्त (कृषि) यांनी या योजनेंतर्गत प्राप्त होणारा निधी व त्याच्या विनियोगाबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहित केलेल्या लेखा पध्दतीनुसार ठेवावा, तसेच सदर निधीच्या विनियोगाबाबत व्यवस्थापकीय संचालक (MSHMPB) आणि संबंधित संचालकांकडून प्राप्त उपयोगिता प्रमाणपत्रांवर आधारीत सर्वंकष उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८३०१४३१४६७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and adf, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2014.08.30 14:29:31 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (कृषि व पणन), मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई

४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे ४११ ००५
८. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. महालेखापाल (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
१३. श्री. आबासाहेब हराळ, कृषि सहसंचालक(वि.प्र.-२), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे
१५. श्री.डी.एल तांबाळे, समन्वयक, महाराष्ट्र कृषि स्पर्धाक्षम प्रकल्प, प्रकल्प समन्वय कक्ष, मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे ४११ ०३७
१६. श्री.डी.डी. वाकुरे, संचालक (NIPHT), तळेगाव दाभाडे, ता. मावळ, जि.पुणे.
१७. श्री. उदय देशमुख, प्राचार्य, प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, पुणे
१८. श्री. अर्जुन म. फुले, उपसंचालक (राष्ट्रीय फलोत्पादन अभियान), साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे
१९. श्री. गोविंद गं. हांडे, तंत्र अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती

**परिशिष्ठ**

**सन २०१४-१५ मध्ये सार्वजनिक व खाजगी भागीदारीतून एकात्मिक कृषि विकासासाठीच्या (PPP-IAD) मंजूर प्रकल्पांचे विवरणपत्र**

**(शा.नि. क्र. राकृवियो- ०८१४/प्र.क्र. ४९/राकृवियो कक्ष दि., २८/०८/२०१४)**

| अ.क्र. | मूल्य साखळीचे पिक | भागीदार कंपनी | खरेदीदार कंपनी / संस्था | प्रकल्प किंमत (रु.लाख) | प्रकल्पातील आर्थिक सहभाग (रु.लाख) | | | | क्षेत्र (हेक्टर) | लाभार्थी शेतक-यांची संख्या | शेती माल खरेदी लक्षांक (मे.टन) | समाविष्ठ जिल्हे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | शासनाचा सहभाग | | खाजगी | शेतकरी | | | | |
| | | | | | राकृवियो | इतर योजना | | | | | | |
| १ | **द्राक्ष - III** | कृषि विज्ञान केंद्र, बारामती, महाराष्ट्र राज्य द्राक्ष बागायतदार संघ, पुणे | चांद फ्रुट कंपनी, मिरज | ४६५.६३ | २२९.७२ | ०.०० | ९८.९६ | १३६.८५ | २८० | ५०० | २२४० | पुणे व सातारा (२) |
| २ | **भात - III** | गोमटेश ॲग्रो प्रोसेसिंग इंडस्ट्रीज, माणगाव, जि. कोल्हापूर | स्वत: कंपनी | ६९३.०४ | २४६.४८ | ०.०० | ३५६.५७ | ९०.०० | ५००० | ५००० | १२००० | कोल्हापूर (१) |
| ३ | **बटाटा बीजोत्पादन** | सिध्दीविनायक ॲग्री प्रा. लि. | स्वत: कंपनी | १४९४.९९ | ४९८.६४ | ०.०० | ५१०.१६ | ४८६.१९ | १६० | ४३५ | ४००० | पुणे, अहमदनगर, सातारा, बुलढाणा, जालना व उस्मानाबाद (६) |
| ४ | **TOPS तंत्राव्दारे पिक कापणी प्रयोगांची संख्या सिमीत करण्यावर संशोधन व विकास प्रकल्प** | निरुती क्लायमेट व इकोसिस्टीम लि., स्वीस रे, भारतीय कृषि विमा कंपनी लि. केंद्रीय कोरडवाहू शेती संशोधन केंद्र, हैदराबाद | लागू नाही | ७९७.०० | ३७७.०० | ०.०० | ४२०.०० | ० | ० | ० | ० | राज्यस्तरावरील संशोधन प्रकल्प |
| ५ | **ऊस** | OLAM ॲग्रो इंडिया लि. हेमरस इंडस्ट्रीज लि. | स्वत: कंपनी | ५२२५.४४ | १७३६.७५ | ०.०० | १५२१.८८ | १९६६.८० | ५२८३ | १२१२३ | ४००००० | कोल्हापूर |
| **एकूण** | | | | **८६७६.१०** | **३०८८.५९** | **०.००** | **२९०७.५७** | **२६७९.८४** | **१०७२३** | **१८०५८** | **४१८२४०** | |